महाराष्ट्र राज्याच्या कौशल्य धोरणाचा मसुदा
तयार करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग
शासन निर्णय क्रमांक: धोरण-२०२४/प्र.क्र.४७/कौशल्य-१
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ जून,२०२४

वाचा :-

१) कौ.वि.व उ.वि., शा. नि.क्र. कौविउ-२०१५/प्र.क्र.१९५/रोस्वरो-१, दिनांक ०३/०८/२०१५.
२) कौ.वि.व उ. विभाग, शा. नि.क्र. कौविउ-२०१५/ प्र.क्र.१२२/ रोस्वरो- १, दिनांक ०२/०९/२०१५.
३) कौ.वि.व उ. विभाग, शा. नि.क्र. कौविउ-२०१८/ प्र.क्र.१२४/ अभियान-१ दिनांक २०/०८/२०१९
४) मा.मंत्री, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता यांचे दिनांक२९ मे, २०२४ रोजीचे पत्र

प्रस्तावना :-

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाची स्थापना सन २०१५ मध्ये झाली असून या विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कौशल्य कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता, परिस्थिती व कालानुरुप प्रशिक्षणाशी निगडीत बदल व सुधारणा करण्यासाठी सं.क्र.१ येथील दिनांक ३ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "शक्ती प्रदत्त समिती" स्थापन करण्यात आली आहे.

२. राज्यातील उद्योगधंद्यांना पूरक मनुष्यबळ उपलब्ध व्हावे, राज्यातील युवा वर्गास त्यांच्या आवडीच्या क्षेत्रातील कौशल्य प्रशिक्षण उपलब्ध व्हावे तसेच रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात म्हणून "प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान" राबविण्यास सं.क्र.२ येथील दिनांक २ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतुदींस अनुसरुन खाजगी, शासकीय, निमशासकीय प्रशिक्षण संस्थांमार्फत ग्रामीण/शहरी भागात कौशल्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येतात. याचबरोबर राज्यातील शासकीय/अशासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून १-२ वर्षांपर्यतचे प्रमाणित औद्योगिक प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येतात. विभागामार्फत सहाय्यित इन्क्युबेशन सेंटर्सच्या माध्यमातून इन्होवेशन साठी तांत्रिक सहाय्य करण्यात येते. उच्च कौशल्य प्रशिक्षणासाठी महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ कार्यरत आहे.

राज्यातील सर्व विभागांच्या कौशल्य प्रशिक्षण कार्यक्रमांचे एकसूत्रिकरण व्हावे याकरीता सं.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये कौशल्य व उद्योजकता विकास क्षमता वृद्धींगत (Capacity Building) करण्यासाठी योजनांचे एकसूत्रिकरण (Convergence) करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

३. राज्यातील कौशल्य विषयक प्रशिक्षण कार्यक्रमाची अंमलबजावणी आणखी प्रभावी कालानुरुप, कालसुसंगत व्हावी आणि विविध विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कौशल्य विषयक कार्यक्रमांमधील द्वीरुक्ती टाळण्यासाठी राज्याचे कौशल्य धोरण तयार करण्याचे प्रस्तावित असून सदर कौशल्य धोरणाचा मसुदा तयार

करण्यासाठी आयुक्त, कौशल्य, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्याच्या कौशल्य धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी आयुक्त, कौशल्य, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांच्या अध्यक्षतेखाली खालील समिती गठीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर समितीची रचना व कार्यपद्धती पुढीप्रमाणे राहिल :-

**महाराष्ट्र राज्य कौशल्य धोरण मसुदा समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी | अध्यक्ष |
| २ | कुलगुरु, सार्वजनिक कौशल्य विद्यापीठ,मुंबई | सदस्य |
| ३ | कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ,कोल्हापूर | सदस्य |
| ४ | श्री. सुहास पेडणेकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ,मुंबई | सदस्य |
| ५ | संचालक, महाराष्ट्र राज्य कौशल्य,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ,मुंबई | सदस्य |
| ६ | श्री. अंबरीश दत्त, सदस्य -सेक्टर स्किल कॉन्सिल- बी.एफ.एस.आय. | सदस्य |
| ७ | प्रादेशिक संचालक, कौशल्य विकास आणि उद्योजकता संचालनालय (RDSD&E), महाराष्ट्र, मुंबई. | सदस्य |
| ८ | विभागीय प्रमुख (पश्चिम), राष्ट्रीय कौशल्य विकास महामंडळ (NSDC), मुंबई. | सदस्य |
| ९ | ५ अशासकीय तज्ञ सदस्य **(प्रपत्र अ)** | निमंत्रित |
| १०. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, म.रा.कौ.वि. सोसायटी, मुंबई | सदस्य सचिव |

i. कौशल्य विषयक धोरणांच्या अनुषंगाने आवश्यकता वाटल्यास संबंधित क्षेत्रांतील ४ (कमाल) कौशल्य विषयक तज्ञ व्यक्तींना बैठकीसाठी निमंत्रित करण्याचे अधिकार समितीच्या अध्यक्षांना राहतील.

ii. सदर धोरण मसुद्याचा मुख्य उद्देश्य हा “कालसुसंगत कौशल्ययुक्त मनुष्यबळाची निर्मिती करण्यासाठी राज्यात कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता परिसंस्थेचा विकास करणे व त्याकरिता औद्योगिक आस्थापना तसेच खाजगी क्षेत्राचा सक्रिय सहभाग” हा असावा.

iii. महाराष्ट्र राज्याचे कौशल्य विषयक धोरणाचा मसुदा तयार करताना राज्य, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय स्तरावरील कौशल्य विषयक अद्ययावत धोरणे / कार्यक्रम / संस्थांच्या कार्यप्रणालींचा विचार करण्यात यावा व राज्याच्या दृष्टीने हितकारक असलेले कौशल्य धोरण तयार करावे.

iv. कौशल्य विषयक धोरणाचा मसुदा तयार करताना आतापर्यंत या विभागामार्फत निर्गमित करण्यात आलेल्या कौशल्य प्रशिक्षण कार्यक्रमांच्या शासन निर्णयांचे पुनर्विलोकन करण्यात येवून त्यांमध्ये सुसूत्रता आणावी.

v. सदर धोरण हे शाश्वत पर्यावरण विकासाशी पूरक तसेच लिंग समानतेवर आधारीत असावे.

vi. समितीच्या बैठकींवेळी येणारा खर्च (बैठक व्यवस्था, चहापान व प्रवास) महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीने त्यांचेकडील उपलब्ध असलेल्या निधीमधून करावा.

२. सदर समितीने ३० दिवसांच्या कालावधीत धोरणाचा प्रारुप मसुदा शासनास सादर करावा.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०६१३१४५०३६५७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITHUN MOHANRAO SALUNKHE

Digitally signed by MITHUN MOHANRAO SALUNKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTERPREUNERSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=eb410b645758d07ea6303743e3a96f12f7b5ea5c78305aa3546f1b05a4d188d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=928224E8C07F06F0A63241EEC16360F9961117B3DFDA771ED6746D1433B5EA7A, cn=MITHUN MOHANRAO SALUNKHE
Date: 2024.06.13 15:05:31 +05'30'

**( मिथुन साळुंखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री /उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
४. मा.मंत्री,कौ. रो.उ. व ना., यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
५. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. सचिव/प्र.स./अ.मु.स.सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, कौ.रो.उ. व ना. विभाग, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, कोकण भवन, मुंबई.
१२. कुलगुरु, सार्वजनिक कौशल्य विद्यापीठ, मुंबई.
१३. कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ,कोल्हापूर
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी/महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी मुंबई.
१५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
१६. संचालक, महाराष्ट्र राज्य कौशल्य,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ,मुंबई
१७. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, म.रा.कौ.वि. सोसायटी, मुंबई
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१९. प्रादेशिक संचालक (पश्चिम विभाग), कौशल्य विकास आणि उद्योजकता संचालनालय (RDSD&E),महाराष्ट्र, मुंबई.
२०. विभागीय प्रमुख (पश्चिम), राष्ट्रीय कौशल्य विकास महामंडळ (NSDC), मुंबई.
२१. श्री. सुहास पेडणेकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ,मुंबई.
२२. श्री. अंबरीश दत्ता,सेक्टर स्किल कॉन्सिल- बी.एफ.एस.आय).
२३. Mr. Deepak Mukadam 12, Amijharna, Saras Baug,Deonar Mumbai-400088.

२४.Prof. Bhagawantrao N. Jagtap, Flat no. C – 23 /26, Kendriya Vihar , CHS., Sector– 38, Seawood Darave, Navi Mumbai – 400706.

२५.Mr. Vishal Tibrewala , 6, J.B. Nagar, Andheri Kurla Road, Mumbai 400059 .

२६.Mr. Anand Mapuskar, Flat no 4, Kirti college staff quarters, Dadar west, Mumbai–28

२७.Mr. Nikhil Nangude, B3/11,Ganga Residency, Hadapsar,, Pune 411028.

२८.निवड नस्ती (कौशल्य-१), कौ.रो.उ.व ना. विभाग, मंत्रालय, मुंबई.

# प्रपत्र – अ

महाराष्ट्र राज्य कौशल्य धोरण मसुदा समिती – अशासकीय तज्ञ सदस्य

| अ.क्र. | अशासकीय तज्ञ सदस्याचे नाव |
|---|---|
| 1 | Mr. Deepak Mukadam (Mo. No. 9821185944)<br>12, Amijharna, Saras Baug,Sion Trombay Road,<br>Deonar, Mumbai-400088 |
| 2 | Prof. Bhagawantrao N. Jagtap (Mo. No. 9619626511)<br>Flat no. C - 23, Block no. 26, Kendriya Vihar CHS.,<br>Sector 38, Nerul West, Seawood Darave,<br>Navi Mumbai - 400706 |
| 3 | Mr. Vishal Tibrewala (Mo. No. 9820071385)<br>6, J.B. Nagar,Andheri Kurla Road,<br>Mumbai 400059 |
| 4 | Mr. Anand Mapuskar (Mo. No. 9820017591)<br>Flat no 4, First floor, Kirti college staff quarters,<br>Inside Kirti College( Gate no 1),<br>Dadar west, Mumbai 400028 |
| 5 | Mr. Nikhil Nangude (Mo. No. 9970122719)<br>B3/11,Ganga Residency,<br>Hadapsar, Pune 411028. |

******************************************************************************